**वैधमापन शास्त्र यंत्रणेतील २१० अस्थायी पदांना दिनांक १ मार्च, २०२२ ते दिनांक ३१ ऑगस्ट २०२२ या कालावधीकरीता मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र. :-वैमाशा-२०१६ /१८४ / प्र.क्र. ४०/ ग्रासं-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक मंत्रालय, विस्तार,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०७ मार्च, २०२२

वाचा:- १) शासन निर्णय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्रमांक संकीर्ण-१००३ /प्र.क्र. ४८३/नापु-१४, दिनांक २६/६/२००३
२) शासन निर्णय क्र -वैमाशा-२०१६ /१८४/प्र.क्र. ४०/ग्रासं-३ दिनांक २३/०८/२०२१,
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि- २०१६/प्र. क्र. ८/१६/ आ.पु.क. दिनांक - २२/०२/२०२२.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त १ येथील दिनांक २६/६/२००३ च्या शासन निर्णयान्वये या विभागाच्या अखत्यारितील विविध विभाग प्रमुखांच्या आस्थापनेवरील पदांच्या सुधारित आकृतीबंधास मान्यता देण्यात आली आहे. त्यामध्ये नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांच्या अधिपत्याखालील पदांचा समावेश आहे.

२. उपरोक्त २ येथील शासन निर्णयान्वये नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील मुंबई आणि जिल्हा स्तरावरील आस्थापनेवर असलेल्या एकूण मंजूर ९४० पदांपैकी २१० अस्थायी पदांना दिनांक ०१/०९/२०२१ ते २८/०२/२०२२ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात आली होती. सदर मुदतवाढ संपुष्टात आली आल्यामुळे त्यापुढील मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यासंदर्भात शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

नियंत्रक, वैधमापन शास्त्र यांच्या आस्थापनेवरील या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्र अ ” मध्ये दर्शविलेल्या एकूण २१० अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२२ ते ३१/०८/२०२२ (सहा महिने) पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

यासाठी होणारा खर्च “मागणी क्रमांक, एम-३, मुख्य लेखाशीर्ष ३४७५, इतर सर्वसाधारण आर्थिक सेवा (१०६), वजन व मापे यांचे विनियमन (००) (०१) वजने व मापे विनियमन, (३४७५००९३)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०२२ - २०२३ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि २०१६ / प्र. क्र. ८/ १६/आ.पु.क. दिनांक २२/०२/२०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात केलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२२०३०७१७२३१७२५०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरी साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHITAL ANAND RAMTEKE

Digitally signed by SHITAL ANAND RAMTEKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=250b23140177f1b91b8d23d0003fea615e62e9fa665cd65cd822d17139dee73b, pseudonym=6E8363396B2786A7F9280A0F6B79E9C7BC0E7B56, serialNumber=7D5A263499F325CA90E9E04FA83D69E04FD5CB75F96BB3FC42610EB9D879192B, cn=SHITAL ANAND RAMTEKE
Date: 2022.03.22 12:06:29 +05'30'

**( शितल रामटेके )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र-वरीलप्रमाणे**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ ( लेखा व अनुज्ञयेता ), मुंबई / नागपूर
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ ( लेखा परिक्षा ), मुंबई / नागपूर
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
५) वित्त विभाग (व्यय-४/अर्थसंकल्प-१९/वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई
६) नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) सह नियंत्रक, वैधमापन शास्त्र, पुणे, नागपुर, औरंगाबाद, नाशिक, अमरावती, कोकण, मुंबई महानगर विभाग, ( नियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुंबई यांचे मार्फत )
८) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई ( ३ प्रती )
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०) सर्व सह नियंत्रक, वैधमापन शास्त्र. (नियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुंबई यांचे मार्फत )
११) निवडनस्ती (ग्रासं-३).

## विवरणपत्र-अ

शासन निर्णय क्रमांक -वैमाशा-२०१६/१८४/प्र. क्र. ४०/ ग्रासं-३ दिनांक ०७ मार्च, २०२२ अन्वये दिनांक १ मार्च, २०२२ ते ३१ ऑगस्ट, २०२२ पर्यंत ( मुदतवाढ ) पुढे चालू ठेवण्यात आलेली अस्थायी पदे.

| अ.क्र | पदनाम | पदे |
|---|---|---|
| १ | उपनियंत्रक वैधमापन शास्त्र | २ |
| २ | सहायक नियंत्रक, वैधमापन शास्त्र | ९ |
| ३ | स्वीय सहायक | १ |
| ४ | अधिक्षक | २ |
| ५ | निरीक्षक, वैधमापन शास्त्र (निवड श्रेणी ) | १४ |
| ६ | निरीक्षक, वैधमापन शास्त्र ( निम्न श्रेणी ) | ४२ |
| ७ | वरिष्ठ लिपीक | २ |
| ८ | कनिष्ठ लिपीक | ११ |
| ९ | टंकलेखक | १ |
| १० | लिपीक-टंकलेखक | १ |
| ११ | प्रयोगशाळा सहायक | २ |
| १२ | क्षेत्र सहायक | ४५ |
| १३ | वाहनचालक | ९ |
| १४ | क्रेन चालक | २ |
| १५ | नाईक | २७ |
| १६ | शिपाई | ४० |
| | **एकूण** | **२१०** |